**जलस्वराज्य-२ कार्यक्रम**
भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेकडील रत्नागिरी, सिंधुदुर्ग व धुळे जिल्हा स्तरीय प्रयोगशाळांच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः जस्वप्र-१०१६/प्र.क्र. १९२ /पापु-११

गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकुल इमारत, ७ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई- ०१
तारीख: ३० मार्च २०१७

**वाचा**

१) **शासन निर्णय क्रमांकः जस्वप्र-१२१३/प्र.क्र.२००/पापु-११, दि. ०४.०१.२०१४**
२) **शासन निर्णय क्रमांकः जस्वप्र०११४/प्र.क्र.२०/पापु-११, दि.१३.०६.२०१४**
३) **शासन निर्णय क्रमांकः डब्ल्युक्युएम-२०१४/प्र.क्र. ०८/पापु-१२, दि. १८.१२.२०१४**
४) **शासन निर्णय क्रमांकः जस्वप्र-१०१६/प्र.क्र. १९२ /पापु-११, दि. २३.१२.२०१६**

**प्रस्तावना**

राज्यातील ग्रामीण पाणी पुरवठा योजनेतील पिण्याच्या पाण्याच्या स्त्रोताची रासायनिक व जैविक गुणवत्ता तपासणीसाठी भुजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेस जबाबदारी देण्यात आली आहे. या अंतर्गत यंत्रणेकडील विभागीय, जिल्हा आणि उप विभाग स्तरावरील प्रयोगशाळांच्या बळकटीकरणा बाबत दि. ०४/०१/२०१४ आणि दि. ०१/०८/२०१६ च्या शासन परिपत्रकाद्वारे मार्गदर्शक सूचना विहीत करण्यात आल्या आहेत.

जलस्वराजय-२ कार्यक्रमांतर्गत पाणी गुणवत्ता तपासणी प्रयोगशाळा बळकटीकरण या उपक्रमांतर्गत जिल्हा स्तरीय आणि उप विभाग स्तरीय प्रयोगशाळांचे बांधकाम प्रस्तावित करण्यात आलेले आहे. शासन स्तरावरून जिल्हा स्तरीय आणि उप विभाग स्तरीय प्रयोगशाळांचे बांधकाम पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र जीवन प्राधिकरण या यंत्रणेद्वारे करण्याचा

निर्णय दि. १३/०३/२०१५ रोजीच्या बैठकीमध्ये घेण्यात आलेला होता. त्यानुसार महाराष्ट्र जिवन प्राधिकरण यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार शासन निर्णय क्र. जस्वप्र-१०१६/प्र.क्र. १९२ /पापु-११, दि. २३.१२.२०१६ अन्वये २३ जिल्हास्तरीय प्रयोगशाळांच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेत आली आहे. यास अनुसरून भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांनी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांना रत्नागिरी, सिंधुदुर्ग व धुळे जिल्हा येथे उपलब्ध करून दिलेल्या मोकळया जागांवर जिल्हा स्तरावरील प्रयोगशाळा बांधकामाकरिता सादर केलेल्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांच्या संनियंत्रणाखालील रत्नागिरी, सिंधुदुर्ग व धुळे या ३ जिल्हा स्तरीय पाणी गुणवत्ता तपासणी प्रयोगशाळांच्या बांधकामास, तसेच याकरीता रू. १०८.९४ लक्ष इतक्या अंदाजपत्रकीय खर्चास पुढे नमुद अटींच्या अधीन राहुन मान्यता देण्यात येत आहे. याबाबतचे विवरण पुढील प्रमाणे आहे.

**जिल्हास्तरीय पाणी गुणवत्ता परिक्षण प्रयोगशाळाचे बांधकाम करणे**

| अ. क्र. | प्रादेशिक विभाग | जिल्हा | जागेची उपलब्धता | क्षेत्रफळ | प्रस्तावित आराखडा | बांधकाम क्षेत्रफळ | निव्वळ किंमत | ढोबळ किंमत |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | मिटर | वर्ग फूट | | वर्ग फूट | रु. लक्ष | रु.लक्ष |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| १ | कोंकण | रत्नागिरी | २०x२० | ४३०४ | D-A | १४९७.१६ | ३८.४३ | ३९.९६ |
| २ | कोंकण | सीधुदुर्ग | २०x२० | ४३०४ | D-A | १४९७.१६ | ३७.७३ | ३९.२४ |
| ३ | नाशिक | धुळे | २०x२० | ४३०४ | D-A | १४९७.१६ | ३१.४९ | ३२.७४ |
| | **एकूण** | **२३ जिल्हे** | | | | | **१०६.१८** | **१०८.९४** |

## अटी व सुचना

१. सदर प्रयोगशाळांचे बांधकाम महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांच्याकडून करण्यात यावे.

२. भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा स्तरावर संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांची जिल्हा स्तरीय प्रयोगशाळा बांधकामाच्या संपूर्ण संनियंत्रणाची जबाबदारी असेल. तसेच जिल्हा स्तरावर वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांना संनियंत्रणाची जबाबदारी देण्यात येत आहे.

३. महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांचे स्तरावर अधिक्षक अभियंता, पनवेल विभाग यांचेकडे संपूर्ण संनियंत्रणाची जबाबदारी असेल.

४. जिल्हा कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी आर्थिक निविदा उघडल्यानंतर निविदा मुल्यांकन प्रस्ताव तयार करुन अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, पनवेल यांच्याकडें मान्यतेस्तव सादर करावी. अधीक्षक अभियंता यांच्या वित्तीय अधिकारापेक्षा जास्त रक्कमेच्या निविदा प्राप्त झाल्यास सदरचे प्रस्ताव प्रकल्प संचालक, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष यांच्याकडे मान्यतेस्तव सादर करावे.

५. प्रयोगशाळांचे बांधकाम, कार्यादेश निर्गमीत केल्यापश्चात सहा महिन्यांच्या कालावधीमध्ये पूर्ण करावा. प्रयोगशाळा यांचे करिता वापरावयाची रंगसंगती व ईतर अनुषंगीक बाबी या बाबत स्वतंत्रपणे निर्देश देणेत येतील.

६. सर्व प्रयोगशाळांसाठी अंदाजपत्रकीय निव्वळ किमतीत तांत्रीक मान्यता प्रदान करणेत आलेली कींमत आणी ढोबळ किंमतीमध्ये महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांच्या प्रशासकीय आणि देखरेखकरिता ४% खर्चाचा समावेश करण्यात आला आहे.

७. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा आणि अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, पनवेल यांनी बांधकामाच्या प्रगतीबाबतचा अहवाल वेळोवेळी सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्षाद्वारे शासनास सादर करावा.

९. जलस्वराजय-२ कार्यक्रमांतर्गत प्रयोगशाळा बळकटीकरण या उपक्रमांतर्गत सर्व निधी संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांना उपलबध करून दिला जाईल. संचालक, भूजल

सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांचेस्तरावरून टप्प्या-टप्प्याने बांधकामासाठीचा आवश्यक निधी सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांचेमार्फत संबंधीत कार्यालये यांना उपलब्ध करून दिला जाईल.

१०. बांधकामापश्चात, प्रयोगशाळा, सर्व प्रशासकीय बाबी आणी कागदपत्रांची पुर्तता करुन शासनाच्या वतीने संचालक, भुसवियं यांना हस्तांतरीत कराव्यात.

११. सदर प्रशासकीय मान्यता शासन निर्णय क्रमांक जस्वप्र - ०११४/प्र. क्र. २०/ पापू - ११, दि.१३ जुन २०१४ अन्वये प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार देण्यात येत आहे.

१२. सदर कामासाठी येणारा खर्च जलस्वराज्य - २ कार्यक्रमांतर्गत प्रयोगशाळांचे बळकटीकरण या उपक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या निधीमधून भागविण्यात यावा. या कामावरील खर्च सादर करण्यात आलेल्या प्रस्तावातील अंदाजपत्रकीय किंमतीच्या मर्यादेत ठेवण्यात यावा.

१३. प्रशासकीय मान्यतेपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची जबाबदारी संचालक, भुजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा आणि अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, पनवेल यांची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३००९४५५६६८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vidya Hampayya
Digitally signed by Vidya Hampayya
Date: 2017.03.30 15:44:30 +05'30'

**(विद्या हम्पय्या)**
शासनाचे अवर सचिव

**प्रत, तातडीची आवश्यक कार्यवाहीकरीता**

१. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, भूजल भवन, शिवाजीनगर, पुणे.
२. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, पनवेल

**प्रत माहितीसाठी :**

१. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
३. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
४. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, सी.बी.डी. बेलापुर, नवी मुंबई
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
६. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नाशिक
७. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सर्व
८. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सर्व
९. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सर्व
१०. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सर्व
११.वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सर्व
१२. सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, सर्व संबंधीत शाखा / नस्ती